ई-साहित्य प्रकाशन
वर्ष दुसरे, अंक ७,
दिनांक २ फेब्रुवारी २०१०




अतिथी संपादक
कुणाल प्रकाश रुद्राके (पुणे)
संपादक
सचिन काकडे (मुंबई), सोनाली घाटपांडे (पुणे), स्वप्ना कोल्हे (नाशिक), भारती सरमळकर (मुंबई)

# I QUIT..

काहीतरी उणं असतं
काहीतरी अधिक असतं
**I QUIT..** म्हणण्या इतपत
मित्रा. . . . . .
आयुष्य का वाईट असतं. . . ?

दोरीआड अडकलेल्या. ..
श्वासात सगळं संपतच असं नाही
बाबांच बोट
आईची कुस
देवाच्या घरी मिळतेच असं नाही. . .

ईच्छा आशा अन, आकांक्षा
सा-या उराशी बाळगायला हवीत
नाही मिळालं काही
तरीही हसत
पुन्हा नवी स्वप्नं पहायला हवीत

मित्रा
**I QUIT..**म्हणण्याआधी
मित्रांच्या मिठीत थोडसं रडुन बघ
आयुष्य खरंच सुंदर आहे
त्याला थोडसं जगुन बघ. .

.........जितेंद्र घाणेकर (कल्याण)


Girl kills self after poor result



# चालायचचं......

अगदिच ब्लँक व्हायचा असं नव्हतं पण
चालायचचं.....

वैतागुन चार-सहा आचमनासारखे निळे जहरी घोट घेतलेही असते..पण..
नकोसे फसफस रसायन उलटुन फेकले जाते म्हणे कधी कधी
एवढं चयापचय - रसायनशास्त्र कळायच तर म्हणजे....
चालायचचं.....

चिडुन बिलगला ही असता लोखंडी घरघर रुळावर... पण..
आजुबाजुचे चार चौघे धावतात, वाचवतात म्हणे कधी कधी
एवढं जिथे वावरतो ते समाजाचं शास्त्र अवगत होतं तर म्हणजे....
चालायचचं.....

भिरकावुन उडाला ही असता.. पण सुसाट धावत्या गाड्या हल्ली ट्रॅफिकमध्ये कुठे..?
निदान ताशी एकशे साठ आणि त्यापुढे झोकुन द्यायला सेकंद सात
एवढं गणित पक्कं सॊडवल होतं तर म्हणजे....
चालायचचं.....

गुंगुन गटांगळ्या खाल्याही असत्या खळबळ पाण्यात..पण..
'पाण्यात पडल्यावर हात पाय मारायला शिकतो' म्हणे कधी कधी..
एवढ्या म्हणी मराठी धड्याच्या शेवट्ल्या पुसट आठवायच्या तर म्हणजे...
चालायचचं.....

रोखुन श्वास..चमचमतं पातं फिरवलही असतं मनगटावरुन..पण..
विरला पदर टरकावुन थांबवता येते म्हणे लाल धार कधी कधी..
एवढं कळायला लायब्ररीत रेफरंस शोधला नाही तरी चालतो हे कळायच तर म्हणजे...
चालायचचं.....

फसलाच एखादा यत्न तर म्हणु..जाऊ दे..कुछ आसुऒंको जुबान नही मिलती
मग एकांती वहीच्या मागल्या पुठ्यावर गिरवुन ठरवु..टु बी ऑर नॉट टु बी..
एवढं हिंदी आणि इंग्रजी लिअर जमायचा तर म्हणजे...
चालायचचं.....

शेवटी बारा फुटी खोलीतल्या पंख्यावर, ५० के.जी. साडेपाच फुटी देह झुलवायला..
लागतो तीन पेर लांब पिळदार दोर वा तसाचसा टॉवेल..आणि लागते गुरुत्वशक्ती..
(चला तर गुरुशक्ती कामास येते तर म्हणजे कधी कधी)
एवढं भौतिकीज्ञान पक्कं सॊडवुन शेवटी तो.........

गेलाच......
चालायचचं.....

मी ही बाप म्हणुन गालावरचा हात खांद्यावर ठेवला असता..
इतके उपप्रश्न सोडवले स्वतःच..जर एवढा मुख्य प्रश्न माझ्याकडे सरकवला असता...
आम्ही अगदीच स्कॉलर नव्हतो पण फायलीत चिटकवल्यागत पडलेली डिग्री कामी येते तर म्हणजे कधी कधी
चालायचचं..........
हां पण तो अगदिच ब्लँक व्हायचा असं नव्हतं ......
पण आता काय...........
चालायचचं.....

**TO BE**
**OR**
**NOT**
**TO BE**
**???**



............प्राजक्त देशमुख (नाशिक)

# अतिथी संपादकाच्या लेखणीतून......

डान्स क्लास बंद केला म्हणुन आत्महत्या , सातवीतल्या मुलाची शाळेत गळफ़ास घेउन आत्महत्या , परिक्षेत नापास झाल्यामुळे आत्महत्या , प्रेमभंग झाला म्हणुन आत्महत्या. . एकापाठोपाठ एक बातम्या येत होत्या . . येत आहेत आत्महत्यांच सत्र अजुन चालुच आहे , हे सारं बघुन, ऐकुन मनात एक विचार आला , च्यायला शिक्षण पध्दती, यत्रंणा , मानसिकता जिवघेणी स्पर्धा , अवाजवी अपेक्षा , ताण या तत्सम गोष्टींवर केस ठोकता येत नाही , तसं झालं असतं तर आजवर अगणित वेळा यांना जन्मठेप आणि फ़ाशीची शिक्षा सुनावली गेली असती. . आठवतयं ?. . . .आठवतयं . . . .लहानपणी खुप खेळायचो आपण, दंगा-मस्ती, धमाल करायचो अगदि ठेचकळायचो , पडायचो अन लागायचंही भरपुर पण, पडायच्या भीतीनं धावणं , खेळणं सोडुन दिलं का आपण कधी? नाहीच ना? बरीच स्वप्न बघतो आपण, काही पुर्ण होतात तर काही अधुरी राहतात पण म्हणुन आपण स्वप्न पहायचं सोडुन द्यायचं का ? प्रयत्न करायचं सोडुन द्यायचं का ? रोज संध्याकाळी दिवा लावतो आपण आपल्या आजुबाजुचा परिसर उजळवुन टाकतो पण त्या प्रकाशाची पाठाराखण अंधारच करत असतो अंधार आहे म्हणुन दिव्याला आणि त्याच्या प्रकाशाला महत्व आहे अगदी तसंच आपल्या जीवनात आपल्या यशाची पाठराखण अपयश करित असतं. आईची माया, बापाचा आधार, भावंडाच्या खोड्या , मित्रांसोबतचे सोनेरी दिवस. . . या सगळया गोष्टींना मागे सोडुन आयुष्य संपवण्या इतकं अपयश मोठ्ठ आहे ? नक्कीच नाही . . . माहित्येय मला, असं वाटतं कधी कधी कि यशाकडे जाणारे सगळे रस्ते संपले । पण आपल्या विचारांपलिकडेही नव्या वाटा आहेत फ़क्त त्या शोधण्याची , त्यातीलच एक मनापासुन निवडण्याची आणि त्या वाटेवर यशस्वी होईपर्यंत चालण्याची जिद्द मनात असायला हवी. आत्महत्या करायचा निर्णय घेण्यापेक्षा , तेच सारं धाडस जिद्द एकवटुन आयुष्य घडवण्याचा निश्चय करा मग बघा यश कसं जोमानं बहतं आयुष्यात शालेय परीक्षात नापास झालेले न चमकलेले आपल्यातले कित्येक चेहरे आज आयुष्याच्या परिक्षेत पास होउन यशाच्या शिखरावर आहेत.

**<u>सचिन तेंडुलकर</u>** - महाविद्यालयाचं तोंडही न पाहिलेला हा माणुस क्रिकेट जगतात आज सा-या मोजमापासाठी परिणाम ठरतोय

**<u>ए. आर. रेहमान</u>** - वयाच्या १५ व्या वर्षी शाळा सोडणारा हा अल्ला रख्खा रेहमान आज जगातील सर्वोत्तम पुरस्काराचा विजेता

**<u>अब्राहम लिंकन</u>** - आयुष्यभर ज्या अपयशानं त्याची पाठ सोडली नाही त्याच अपयशाला चितपट करुन त्या अपयशाच्या छाताडावर लोकशाहीचा यशस्वी झेंडा रोवला त्याने जगासाठी

**<u>गुलजार</u>** - उर्दु मध्ये नापास (विश्वास बसतंच नाही ना) गेली चार दशकं यांच्या शायरीनं तमाम रसिकांना वेड लावलय

**<u>इंदिरा गांधी</u>** –" गुंगी गुडिया " म्हणुन याच "आयर्न लेडी " ला विरोधकांनी त्यांच्या राजकिय कारकिर्दीच्या सुरुवातीला हिणवलं होतं

कॉलेजात असताना पहिल्यांदाच बाईक घेवुन दिली होती घरच्यांनी अन एकदा बेदकारपणे वेगात बाइक चालवताना एक वळणावर बोर्ड वाचला " वाहन जपुन चालवा, घरी कोणीतरी वाट पाहत आहे " त्या दिवसानंतर निष्काळजीपणे गाडी चालवायला मन धजावलच नाही कधी तुमच्या आई-वडीला, भावडं, मित्र-मंडळींच्या वतीनं एकच प्रेमळ विनंती आहे मित्रांनो **<u>"घरी कोणीतरी वाट पाहत आहे" हा बोर्ड शाळा कॉंलेजात लावायची वेळ येउ देउ नका</u>**

**..........कुणाल प्रकाश रुद्राके (पुणे)**

# होम कॉलिंग......

एक पाउल पुढे आणि मागचं सारं संपणार होतं
जीवन मरणाच्या लढाईत आज मरणंच जिंकणार होतं
संपणार होता तो अन, त्याच्यासोबत . . . . अपयशाचा कलंक
राजा बनायला चाललेला एक अपयशी रंक
थांबवता येत नाही म्हणुन चालु असलेला श्वास
जगण्यावर असलेला नसलेला विश्वास
कधीही न संपणारी मालिका ती अपयशाची
उरी बाळगलेली खोटी आशा ती यशाची
मैत्री प्रेम नि नात्याची सारी ती बंधन
थकलेल्या काळजाची सारी ती स्पंदनं
अपयशाच्या खपलीखाली जपलेली जिवंत वेदना
अपयशाच्याच धास्तीनं मेलेली संवेदना
स्वप्नं, सत्य, आशा, निराशा. . . . .
टचके टोमणे अन होणारी फ़रफ़ट अताशा
जिद्द स्पर्धा हाल - अपेष्टा. . . .
अपेक्षांच्या ओझ्याखाली होणारी चेष्टा
पाउल पुढे टाकणार तेवढ्यात फ़ोन वाजला
**<u>होम कॉलिंग</u>**
पाणावलेल्या डोळयानंच त्यानं फ़ोनवरचा मजकुर वाचला
“होम “ या एका शब्दानचं त्याचं पाउल तिथंच अडलं
अन, चुक स्वतःची उमजुन ते पोरं ढसाढसा रडलं
घरातुन अजुनही त्याला कुणीतरी बोलावत होतं
अपयशाच्या दरीतही त्याला यश खुणावत होत




त्यालाही कळुन चुकलं “ टाकिचे घाव सोसल्याशिवाय देवपण येत नाही “
यशाची चावी सहजासहजी अशी कुणाच्या हाती देव पण देत नाही
मागे फ़िरत परत जिंकण्याचा त्याने केला निर्धार
कारण घरच्यांची माया , मित्रांचं प्रेम अन जिद्दीचा मिळाला आधार
आज माघार घेउनही खरंतर तो जिंकला होता. . . . .
अपयश आणि निराशेचा अंधकार प्रेम अन जिद्दीच्या संधीप्रकाशानं संपला होता. . . .

..........कुणाल प्रकाश रुद्राके (पुणे)

# विद्यार्थी मित्रांनो...............



तात्पुरत्या समस्यांवरती
कायमचे उपाय करु नका
आत्महत्या करुन असे
भित्र्यांसारखे मरु नका

यश अपयश येत राहिल
अशी कच खाउ नका
क्षुल्लक क्षुल्लक गोष्टींसाठी
प्राणांच मोल देउ नका

आत्महत्या करुन कुणाला
समस्यांचं उत्तर मिळालेलं नाही
तुम्ही तर विद्यार्थीच
अजुन जीवनही कळालेलं नाही

...........सुर्यकांत डोळसे, पाटोडा (बीड)

# लढ तु, अरे भिड तु.........

खुणाव त्या अस्मानाला
पाहु देत हिम्मत तयाची
हाक दे जरा आज मनाला

तरी मरायचय...
बिनधास्त मर.. पर
उससे पेहले कुछ तो कर
ऊन जरी, अन जरी सावल्या
अस्मानाने तुला दावल्या
“मी” आहे मग कसली फिकर
सीनेसे निकाल जीने का डर
घे स्वप्नांचे हे नवे पर
घे वाराही तुज उड म्हणाला
भिड रे भिड तु अस्मानाला....

हरण्याचा हा तुझा विचार
दोस्तीला रे करी लाचार
दोस्तानांही विसरलास येडा?
डोक्यातुन हा काढ किडा
अरे जरी गंदगी तरी
“एक जिंदगी”
त्यात स्वप्नांची नुसतीच वादळं
मनही साला त्यात उधळं
रहा ताठ उभा अन सांग नभा
माझ्यासाठी तु पुन्हा उजळ
दाखव तयाला खरी चिड
“मी” आहे बिनधास्त भिड
भिड रे भिड तु अस्मानाला...

“मी” तुझ्याच सोबत नेहमी असणारा तुझा
कुणीही असु शकतो मित्र, बाप, भाऊ.... तरी
मित्रांचच ऐकणा-या या वयाला खरंच मनापासुन
सांगतोय मित्रा हरण्याला मरणं हा पर्याय नाहिंच.

“मी” आहे तु बिनधास्त लढ !!!!!!

........सचिन काकडे



